**नोंदणी अधिनियम, १९०८ च्या कलम २१ व २२ मध्ये सुधारणा करण्यासाठी शासनास शिफारशी करण्यासाठी समिती गठित करणे बाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- नोंदणी-२०२३/प्र.क्र.१०८/म-१(धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २४ मार्च, २०२३.

<u>वाचा</u>:- १) नोंदणी अधिनियम, १९०८.
२) महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१.
३) नोंदणी महानिरीक्षक कार्यालयाचे परिपत्रक क्र. का.४/प्र.क्र.२४९/२०१३/४५४, दि.१२/०७/२०२१.

<u>प्रस्तावना:-</u>

नोंदणी अधिनियम, १९०८ व महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ चे नियमामधील तरतुदीनुसार दस्तांची नोंदणी केली जाते. महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ चे नियम ४४ मध्ये दस्त नोंदणी करण्यापूर्वी दुय्यम निबंधकांनी कोणत्या बाबी तपासाव्यात याची सूची देण्यात आली आहे. नोंदणी अधिनियम, १९०८ चे कलम २१ व २२ मध्ये दस्तातील मिळकतीचे वर्णन संदिग्धता निर्माण होणार नाही, अशा प्रकारे ओळखता येईल इतपत पुरेसे असणे आवश्यक असल्याबाबत नमूद आहे.

२. महाराष्ट्र धारण जमिनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्याचे एकत्रिकरण करण्याबाबत (सुधारणा) अधिनियम, २०१५ चा आधार घेवून नोंदविण्यात येत असलेल्या दस्तांसंदर्भात नोंदणी महानिरीक्षक कार्यालयाने दि. १२/०७/२०२१ रोजी स्पष्टीकरणात्मक परिपत्रक निर्गमित केले होते. सदर परिपत्रकाविरुध्द श्री. गोविंद रामलिंग सोलपुरे व इतर २ यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठामध्ये रिट पिटीशन क्र.२१११/२०२२ दाखल केले होते. प्रस्तुत रिट पिटीशनच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठाने दि. ०५/०५/२०२२ रोजी निर्णय पारित केला आहे. प्रस्तुत प्रकरणामध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठाच्या सदर निर्णयाच्या अनुषंगाने नोंदणी महानिरीक्षक कार्यालयाने मा. उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठासमोर दि. ०६/०६/२०२२ रोजी पुनर्विलोकन अर्ज (review appeal) दाखल केला आहे. त्याचा निर्णय अद्याप प्रलंबित आहे.

३. वर नमूद नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ आणि महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ चे नियम ४४ तसेच नोंदणी महानिरीक्षक कार्यालयामार्फत निर्गमित झालेले परिपत्रक दि.१२/०७/२०२१ नुसार दस्त नोंदणी करताना सदर कलम, नियम व परिपत्रक यांचे पालन करून दस्त नोंदणी करण्याबाबत दुय्यम निबंधक यांना अडचणी भेडसावत आहेत. त्या अनुषंगाने नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ चे सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने व त्यामधील तरतुदी अधिक परिणामकारक करण्यासाठी चर्चा/उहापोह करून त्यात सुधारणा प्रस्तावित करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत दिनांक २३/२/२०२३ रोजी आयोजित केलेल्या महसूल परीषदेत चर्चेदरम्यान ठरविण्यात आले आहे. त्यामुळे नोंदणी अधिनियम, १९०८ च्या कलम २१ व २२ मध्ये सुधारणा करण्यासाठी शासनास शिफारशी करण्यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ आणि महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ चे नियम ४४ तसेच नोंदणी महानिरीक्षक कार्यालयामार्फत निर्गमित झालेले परिपत्रक दि.१२/०७/२०२१ नुसार दस्त नोंदणी करताना सदर कलम, नियम व परिपत्रक यांचे पालन करून दस्त नोंदणी करण्याबाबत दुय्यम निबंधकांना येणाऱ्या अडीअडचणी दूर करण्याच्या

अनुषंगाने तसेच नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ चे सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने व त्यामधील तरतुदी अधिक परिणामकारक करण्यासाठी त्यात सुधारणा करण्याच्या अनुषंगाने सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारशी करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिकाऱ्याचे नाव** | **पदनाम** |
|---|---|---|
| १. | श्री. श्रावण हर्डीकर, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे. | अध्यक्ष |
| २. | डॉ. विपिन इटनकर, जिल्हाधिकारी, नागपूर. | सदस्य |
| ३. | श्री. विनय गौडा जी सी, जिल्हाधिकारी, चंद्रपूर. | सदस्य |
| ४. | डॉ. राजा दयानिधी, जिल्हाधिकारी, सांगली. | सदस्य |
| ५. | श्री. बी. डी. काळे, उप संचालक, भूमि अभिलेख, पुणे. | सदस्य |
| ६. | श्री. कमलाकर हत्तेकर, जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, पुणे. | सदस्य |
| ७. | श्री. उदयराज चव्हाण, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, पालघर. | सदस्य |
| ८. | श्री. संतोष हिंगाने, सह जिल्हा निबंधक वर्ग-२ तथा प्रशासकीय अधिकारी, नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उप नियंत्रक, पुणे विभाग, पुणे. | सदस्य |
| ९. | श्री. दिपक सोनवणे, नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उप नियंत्रक (संगणक), महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य सचिव |

**२. समितीची कार्यकक्षा:-**

१) नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ चे सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने व त्यामधील तरतुदी अधिक परिणामकारक करण्यासाठी त्यात सुधारणा करण्याच्या अनुषंगाने सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारशी करणे.

२) नोंदणी अधिनियमाचे कलम २१ व २२ आणि महाराष्ट्र नोंदणी नियम, १९६१ चे नियम ४४ तसेच नोंदणी महानिरीक्षक कार्यालयामार्फत निर्गमित झालेले परिपत्रक दि.१२/०७/२०२१ नुसार दस्त नोंदणी करताना सदर कलम, नियम व परिपत्रक यांचे पालन करून दस्त नोंदणी करण्याबाबत दुय्यम निबंधकांना येणाऱ्या अडीअडचणी दूर करणे.

३) समितीच्या अध्यक्षांना सदर कामासाठी उपरोक्त नमूद सदस्यांव्यतिरिक्त क्षेत्रीय स्तरावरील माहितगार किंवा अभ्यासू अधिकारी किंवा तज्ज्ञ व्यक्तींना समितीच्या बैठकीस बोलविण्याचा अधिकार राहील.

४) समिती अध्यक्ष बैठकीसाठी वेळोवेळी निर्देश देतील,त्यावेळी वरील सर्व समिती सदस्यांनी बैठकीस उपस्थित रहावे.

५) समितीने सविस्तर अहवाल एक महिन्यात शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२४१५५७३५६६१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2023.03.24 16:02:52 +05'30'

**( सुनिल जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ०३२.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५. मा. सभापती/ अध्यक्ष, (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
६. मा. उपसभापती/ उपाध्यक्ष, (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन,मुंबई- ४०० ०३२.
७. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव,विधान भवन,मुंबई-३२.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१.
११. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे- ४११ ००१.
१२. डॉ. विपिन इटनकर, जिल्हाधिकारी, नागपूर.
१३. श्री. विनय गौडा जी सी, जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
१४. डॉ. राजा दयानिधी, जिल्हाधिकारी, सांगली.
१५. श्री. दिपक सोनवणे, नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उप नियंत्रक (संगणक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. श्री. बी. डी. काळे, उपसंचालक, भूमि अभिलेख, पुणे.
१७. श्री. उदयराज चव्हाण, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, पालघर.
१८. श्री. कमलाकर हत्तेकर, जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, पुणे.
१९. श्री. संतोष हिंगाने, सह जिल्हा निबंधक वर्ग-२ तथा प्रशासकीय अधिकारी, नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उप नियंत्रक, पुणे विभाग, पुणे.
२०. निवडनस्ती, कार्यासन (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.